महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) या संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब संवर्गात पदोन्नतीबाबत (पुरक निवडसूची सन २०२२-२३)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि २४२२/प्र.क्र.२५३/१५अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ**:- १)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब,दि.०७/०५/२०२१,
२) सामान्य प्रशासन विभागाची दि.१४/७/२०२१ रोजीची अधिसूचना
३) शासन समक्रमांक दिनांक २९/०५/२०२३ रोजीचे आदेश.

**शासन आदेश** :-

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) (वेतनश्रेणी एस-१५ : रु.४१८०० - १३२३००) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (तालुका कृषि अधिकारी/ तंत्र अधिकारी) (वेतनश्रेणी एस-१६ : रु.४४९०० - १४२४००) या संवर्गात त्यांना वाटप झालेल्या महसुली विभागात व प्रशासकीय सोईच्या दृष्टिने पुढील अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरती पदोन्नती पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप करण्यात आलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.जाधव दिलीप विजय<br>मंडळ कृषि अधिकारी, तामसा, ता.हदगाव, जि.नांदेड | औरंगाबाद | तालुका कृषि अधिकारी, भोकर, जि.नांदेड (रिक्त पदी) |
| २ | श्री.पायघन विनायक बळीरामजी<br>मंडळ कृषि अधिकारी, साखरा, ता.सेनगाव, जि.हिंगोली | नागपूर | तालुका कृषि अधिकारी, राजुरा, जि.चंद्रपूर (श्रीमती तागर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधिन राहुन आणि सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

**(ब)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(क)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/९/२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.१/८/२०१९ मधील तरतुदीनुसार

संबंधित अधिकाऱ्यांचे नाव सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२३-२४ व २०२४-२५) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांचा नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२५-२६) महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**(ड)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**(इ)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याचा पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दि.२१/६/२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

**३.** वरील अधिकाऱ्यांची परस्पर सेवाज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागाने सन २०२२-२३ च्या निवडसूचीला दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

**४.** आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.**५.**

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१४१७४३२२२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a77738ea5ab09abd99367b03338ce9c16517e87d42e99469f031c79ff053aeea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2023.08.14 17:46:04 +05'30'

**( ज्योत्स्ना अर्जुन )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

१. मा. मंत्री (कृषि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (फलोत्पादन) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव ,(सेवा)सामान्य प्रशासन विभाग.मुंबई ,मंत्रालय ,
४. अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई ३२
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
६. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय , पुणे.
७. सर्व सह सचिव /उप सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व कृषि संचालक व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, पुणे
९. सहसंचालंक(आस्थापना), कृषि आयुक्तालय , पुणे
१०. सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, पुणे
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे)
१२. संबंधित अधिकारी व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, पुणे
१३. निवडनस्ती १५ अे